GR. 20040818154612001-0100

**शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना अत्युकृष्ट कामाबद्दल आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
**शासन परिपत्रक क्रमांक : आवेवा-१००२/प्र.क्र.११/२००२/आठ,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- **२९ ऑगस्ट,२००३.**

संदर्भ : या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक १९ ऑगस्ट, २००२ चे परिपत्रक

**परिपत्रक**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना अत्युत्कृष्ट कामाबद्दल दिनांक १-१०-२००२ रोजी देय होणा-या आगाऊ वेतनवाढ/वाढी मंजूर करण्याच्या प्रस्तावांवर कार्यवाही करण्यास संदर्भाधीन परिपत्रकाद्वारे पुढील आदेशापर्यंत स्थगिती देण्यात आलेली होती.

२. प्रस्तुत प्रकरणी प्रशासकीय सुधारणा समितीने व्यक्त केलेले अभिप्राय विचारात घेता सदर स्थगिती उठविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्या अनुषंगाने आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

३. सदर निर्णयानुसार, दिनांक १ ऑक्टोबर, २००२ रोजी तसेच त्यापुढील कालावधीत देय आगाऊ वेतनवाढीचे प्रस्ताव विचारात घेता येतील.

४. सदर आदेश वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/सेवा-३ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. ५५७/०३/विसु- १, दिनांक ३१-७-२००३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( **प्रकाश लोखंडे** )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

[ **कृ. मा. प.**

२च. ५५१ ( ६,००० - ०८ - ०३)

D:\PSMAdv gr